(200)

20150422128427 0527

कुंभोशी खारभूमी विकास योजना,ता.रोहा,
जि.रायगड या खारभूमी योजनेस प्रशासकीय
मान्यता प्रदान करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
जलसंपदा विभाग ,
शासन निर्णय क्र. खाभूयो २००६/७६९/(१९२/२००६)/खारभूमी
मत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ११/९/२००६

पहावे :- १)मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,कोकण प्रदेश,मुंबई यांचे पत्र क्र.३८०६/खाभू/कुंभोशी/तां.१/२८०६, दि. ५.७.०६ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

रायगड जिल्हयाच्या रोहा तालुक्यातील कुंभोशी खारभूमी योजनेस सन २००३-२००४ च्या दरसूचीवर आधारित रु.३१,१३,८९५/- रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव मुख्य अभियंता,जलसंपदा विभाग,कोकण प्रदेश,मुंबई यांच्याकडून शासनास प्राप्त झाला होता व तो शासनाच्या विचाराधीन होता. या संदर्भात खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**

१. तालुका रोहा जिल्हा रायगड,येथील कुंभोशी खारभूमी विकास योजनेस सन २००३-२००४ च्या दरसूचीवर आधारित प्राक्कलनानुसार कामाच्या एकूण अंदाजित रु.३१,१३,८९५ (रुपये एकतीस लक्ष,तेरा हजार आठशे पंच्याण्णव फक्त यापैकी रु.२४८११९१/- कामाप्रीत्यर्थ व रु.६३२७०४/- अनुषंगिक खर्च) रकमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. अंदाजपत्रकाचा गोषवारा सोबत जोडलेल्या विवरणपत्रात देण्यांत आला आहे.

२. या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्र.आय-३/मुख्य लेखाशीर्ष ४४०२-मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (१०२) मृदसंधारण-खार जमीन योजना (१) बांधकामे - योजनांतर्गत या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व त्याखालील मंजूर अनुदानातून भागवावा. तसेच निधीच्या उपलब्धतेशिवाय या योजनेवर कुठल्याही प्रकारचा खर्च करु नये.

३. हा शासन निर्णय, आंतरवित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग यांच्या सहमतीने प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान केलेली प्रशासकीय मान्यता अ.क्र.५/२००६ वर नोंदविण्यात आलेली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

११/९/२००६
( श. शि. माने )
शासनाचे अवर सचिव

प्रत अंदाजपत्रकाच्या गोषवाऱ्यासहः-

महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
महालेखापाल, लेखा परिक्षा , मुंबई/नागपूर
वित्त विभाग (व्यय १२), मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग (कार्यासन १४६१) मंत्रालय,मुंबई
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,कोकण प्रदेश,मुंबई
आंतरवित्त सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे.
उपअभियंता, (खारभूमी) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यकारी अभियंता, खारभूमी सर्वेक्षण व अन्वेषण विभाग, पेण,रायगड,

जिल्हाधिकारी, रायगड.

स्वीय सहायक, राज्यमंत्री (खारजमिनी) मंत्रालय, मुंबई

स्वीय सहायक, मंत्री (खारजमिनी) मंत्रालय, मुंबई

विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय,मुंबई

खारभूमि कार्यासन संग्रहार्थ.

---

(दिनांक सप्टेंबर,२००६ चा शासन निर्णय,जलसंपदा विभाग क्र.खाभूयो-२००६/७६९/(२९२/२००६) खारभूमी चे सहपत्र)

विवरणपत्र

कुंभोशी खारभूमी विकास योजना,ता.रोहा.जि.रायगड

(अंदाजपत्रकाचा गोषवारा)

| अ.क्र. | बाब | एकूण (रु) |
|---|---|---|
| १ | ए.प्राथमिक | ३१९७.०० |
| २ | बी.भूसंपादन | ०० |
| ३ | सी.कामे | १७११६१०.०० |
| ४ | एफ.आरएचटी कामे | ६९२०९२.०० |
| ५ | के.इमारती | १२२१९.०० |
| ६ | एम.वृक्षारोपण | १,२०९.०० |
| ७ | ओ.संकीर्ण | १,०००.०० |
| ८ | पी.देखभाल | १,२२२.०० |
| ९ | आर.दळणवळण | १८६४२.०० |
| | कामाप्रीत्यर्थ | २४,८१,१९१.०० |
| | अनुषंगिक खर्च<br>(भूसंपादन किंमत वगळून २५.५० टक्के) | ६,३२,७०४.०० |
| | एकूण | ३१,१३,८९५.०० |

ठळक वैशिष्टये

| | |
|---|---|
| पुनः प्रापित होणारे क्षेत्र (हेक्टर) | २६.३१ हेक्टर |
| प्रती हेक्टरी किंमत (रु) | १,१८,३५४ < १,१८,७५० ठिक आहे |
| लाभव्यय गुणोत्तर | २.६१ > १.०० ठिक आहे |
| दरसूची वर्ष | २००३-२००४ |